राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० Supplementary PIP मधील प्राप्त अनुदानातून ६० BLS (Basic Life Support) प्रकारच्या रुग्णवाहिका (OPEX Model) भाडेतत्वावर बाह्यसेवा पुरवठादाराकडून कार्यरत करण्यासाठीच्या निविदा प्रक्रिया करण्याकरीता प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.०८/आरोग्य -७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २७ एप्रिल, २०२०.

**वाचा :-**

१. प्रकल्प संचालक ई.एम.एस. राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांचे पत्र क्र. राआसो/६०BLS amb/ प्रशासकीय मान्यता/१०५०७६/ २०२०, दिनांक ११ फेब्रुवारी २०२०.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची दिनांक ०६ फेब्रुवारी, २०२० रोजीची मान्यता.

**प्रस्तावना :-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मंजूर Supplementary PIP अंतर्गत उपलब्ध अनुदानातून राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत अतिरिक्त ६०BLS प्रकारच्या रुग्णवाहिका (Opex Model/ भाडेतत्वावर) सेवा बाह्यसेवा पुरवठादाराकडून निविदा प्रकियेद्वारे कार्यरत करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या पीआयपीमधील मंजुरीत ( Supplementary PIP २०१९-२० ) नमुद केलेल्या अटी व शर्तीचे अवलोकन केले असता प्रस्तावित ६० BLS प्रकारच्या रूग्णवाहीका AIS Norm प्रमाणे Opex Model च्या धर्तीवर बाहय संस्थेला चालविण्यास देण्याबद्दलची ही योजना आहे. या योजनेअंतर्गत सर्व रूग्णवाहीका या सेवा पुरवठादाराच्या मालकीच्या असतील. या रुग्णवाहिकांमध्ये अत्याधुनिक उपकरणे, औषधे व प्रशिक्षित डॉक्टर तसेच कर्मचारी यांची सुविधा असणार आहे. शासन फक्त भाडेतत्वावर या रूग्णवाहीकांना दरमहा रू.१.२५ लक्ष अदा करेल. याकरीता बाहय सेवा पुरवठादार नेमण्याकरीता निविदा प्रक्रिया राबविण्यासाठी प्रशासकीय

मान्यतेस्तव प्रस्ताव प्रकल्प संचालक (EMS) राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास सादर केलेला आहे.

वरील प्रस्ताव विचारात घेता, तसेच आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी मान्यता दिल्यानुसार केंद्र शासनाने FMR Code ७.४.९ या लेखाशीर्षांतर्गत रु.३७५.०० लक्ष इतक्या अनुदानातून प्रकल्प संचालक (ईएमएस), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी प्रस्तावित केल्यानुसार राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत ६० BLS (Basic Life Support) प्रकारच्या रुग्णवाहिका सेवा पुरवठादाराकडून (OPEX Model) भाडेतत्वावर रु. १.२५ लक्ष प्रती रुग्णवाहिका याप्रमाणे एकूण अंदाजित रक्कम रु.३७५.०० लक्ष इतक्या खर्चाच्या निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.:-

**अटी :-**

१) सदरची BLS रुग्णवाहिका सेवा बाह्यसेवा पुरवठादाराकडून घेणे प्रस्तावित आहे. ज्यामध्ये रुग्णवाहिकेसह उपकरणे, औषधे व कर्मचारी वर्ग, इंधन खर्च व इतर खर्च स्वत: बाह्य यंत्रणेने करणे व काम सुरु झाल्यानंतर प्रति महिना OPEX च्या बिलाची रक्कम सदर बाह्य यंत्रणेस अदा करण्यात यावी.

२) सदर सेवेबाबत आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबीची निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

३) सदरहू बाबीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदरहू बाबीचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींवरच निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

५) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित बाबींचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे निविदा प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत

आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

६) सदरहू बाबीसाठी होणारा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राज्य आरोग्य सोसायटीकडून NHM अंतर्गत सन २०१९-२० साठी Supplymentry PIP अंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या लेखाशिर्ष FMR Code ७.४.९ अंतर्गत मंजुर करण्यात आलेल्या रु.३७५.०० लक्ष इतक्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची निविदा प्रक्रिया प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

७) तसेच, या बाबींची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

८) संपूर्ण निविदा प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

९) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

१०) निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

११) ज्या रुग्णवाहिका तैनात केल्या जाणार आहेत त्यामध्ये AIS निकषांचे पालन होणे आवश्यक राहील. तसेच त्या मध्ये सर्व आवश्यक उपकरणे व औषधे या सह प्रशिक्षित वैद्यकीय तंत्रज्ञ (Emergency Medical Technicians) असणे अनिवार्य राहील.

१२) त्यांची सध्या अस्तित्वात असलेल्या कॉल सेंटरला संलग्नता बंधनकारक राहील. तसेच ज्या भागात सध्याच्या रुग्णवाहिका १४० कि.मी. पेक्षा जास्त धाव घेत आहेत व लाभार्थ्यांच्या / गरजुंच्या मागण्या पूर्ण होऊ शकत नाहीत अशाच ठिकाणी या नवीन रुग्णवाहिका तैनात करण्यात याव्यात.

१३) सर्व जुन्या व नव्या रुग्णवाहिकांचा प्रतिाद कालावधींचे (Response Time) जे दुरध्वनी स्विकृत केले गेले नाहीत त्यासह संनियंत्रण करण्यात यावे.

१४) उबेर अथवा अन्य ॲप आधारीत रुग्णवाहिकांच्या BLS मॉडेल प्रमाणे प्रती रुग्णवाहिका रु. १.२५ लक्ष या दराने प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते १४ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची तसेच यासंदर्भात काही सेवा घ्यावयाची असल्यास ती नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण

जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, मुंबई व राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202003301518457717 असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4af f97da20b708981b5122e87c8346c4cc 7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167 bc99cd85325223aceef69d02bd455b7 ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2020.04.27 15:28:02 +05'30'

**वर्षा भरोसे**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

प्रकल्प संचलक (ईएमएस), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

प्रत,

१) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सहसंचालक (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५) सह संचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६) वरिष्ठ सल्लागार, पीपीपी, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
७) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
८) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
९) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
१०) निवडनस्ती (आरोग्य-७)